**सर्वश्री सु.सा.चौधरी व आ.न.वसावे,**
**उप सचिव यांना उप सचिव पदावरील**
**पदोन्नतीचा मानीव दिनांक देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः उसप १३१०/प्र.क्र.१६२/१०/का.१४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३१ मार्च २०१७

संदर्भ :- १) सा.प्र.वि. आदेश क्र.उसप १३१०/प्र.क्र.७२/१०/का.१४, दि.२७.०१.२०१४
२) सा.प्र.वि. आदेश क्र.असप १२०८/प्र.क्र.११/०८/१४, दि.३०.०१.२०१६
३) सा.प्र.वि. परिपत्रक क्र.असज्ये १२१६/प्र.क्र.१८५/का.१४, दि.०४.०८.०१६
४) सा.प्र.वि. आदेश क्र.उसप १३१६/प्र.क्र.२४८/का.१४, दि.२१.१२.२०१६

**आदेश**

मंत्रालयीन सर्वगातील उप सचिव पदावर पदोन्नतीसाठी पात्र अवर सचिवांची सन २०१०-११ ची १९ पदांसाठी निवडसूची तयार करण्यात आली होती.

२. सर्वश्री सु.सा.चौधरी व आ.न.वसावे या अ.ज. प्रवर्गातील अधिकाऱ्यांविरुध्द सिटी टॉवर गृहनिर्माण संस्थेतील गैरव्यवहार प्रकरणी विभागीय चौकशी सुरु असल्याने त्यांचा अवर सचिव पदावरील पदोन्नतीसाठी विचार करण्यात आला नव्हता. परिणामी, उप सचिव पदावरील सन २०१०-११ ची निवडसूची तयार करताना विचारक्षेत्रात त्यांचा समावेश करता आला नाही. आदिवासी विकास विभागाने शासन आदेश दि.१७.५.२०१० च्या आदेशान्वये सर्वश्री सु.सा.चौधरी व आ.न.वसावे यांना विभागीय चौकशीतून दोषमुक्त केले.

तद्नंतर सर्वश्री सु.सा.चौधरी व आ.न.वसावे यांची उपरोक्त फौजदारी खटल्यातून निर्दोष मुक्तता करण्यात आल्यानंतर, सदर निर्णयाविरुध्द सत्र न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या अपीलावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सर्वश्री सु.सा.चौधरी व आ.न.वसावे यांना दि.२७.०१.२०१४ च्या आदेशान्वये अवर सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली. तसेच त्यांना दि.३०.०१.२०१६ च्या आदेशान्वये अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक देण्यात आले.

३. सिटी टॉवर प्रकरणातील श्री.भा.र.गावीत व अन्य अधिकारी यांनी त्यांना उप सचिव/ अवर सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक व त्या अनुषंगाने इतर लाभ मिळण्यासाठी मा.म.प्र.न्या., मुंबई येथे मूळ अर्ज क्र.२९६/२०१५ दाखल केला आहे. सदर मूळ अर्जावर दि.२८.३.२०१६ रोजी झालेल्या सुनावणीमध्ये मा.न्यायाधिकरणाने त्यांना उप/ अवर सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्यासंदर्भात चार आठवडयात निर्णय घेण्याचे निदेश दिले. त्यास अनुसरुन संदर्भाधनी क्र.२ येथील दिनांक ०४.०८.२०१६ च्या परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या अवर सचिवांच्या तात्पुरत्या ज्येष्ठतासूचीमध्ये सर्वश्री चौधरी व वसावे यांना अवर सचिव पदावरील ज्येष्ठतेचा दिनांक देण्यात आले आहेत.

४. आता, सर्वश्री सु.सा.चौधरी व आ.न.वसावे यांना सन २०१०-११ च्या निवडसूचीवर उप सचिव पदावरील पदोन्नतीसाठी आस्थापना मंडळाने पात्र ठरविले असल्याने, त्यांना दि.१५.०७.२०११ हा दिनांक उप सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्यात येत आहे. सर्वश्री सु.सा.चौधरी व आ.न.वसावे हे

सन २०१०-११ च्या निवडसूचीवर पात्र ठरले असल्यामुळे, सदर निवडसूचीमधील सेवा कनिष्ठ अधिकारी श्री.सो.ना.बागुल व श्रीमती चि.नि.सूर्यवंशी यांची नावे सदर निवडसूचीतून वगळण्यात येऊन त्यांना प्रदान करण्यात आलेले उप सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचे दिनांक संदर्भाधीन क्र.३ येथील आदेशान्वये रद्द करण्यात आले आहेत.

५. सदर उप सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून तसेच याचिका क्र. २९८२/२०००, २९८६/२००० व ४९५८/२००३ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे. सदर मानीव दिनांक महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

६. सर्वश्री सु.सा.चौधरी व आ.न.वसावे यांचा उप सचिव पदावरील मानीव दिनांक हा सेवाज्येष्ठता व वेतननिश्चितीसाठी ग्राहय धरण्यात यावा. सर्वश्री चौधरी व वसावे यांची सदर दि.१५.०७.२०११ हया मानीव दिनांकापासून उप सचिव पदावर पदोन्नतीचा प्रत्यक्ष कार्यभार स्विकारल्याच्या तारखेपर्यंत काल्पनिक वेतन निश्चिती करुन, वेतन निश्चितीचा प्रत्यक्ष लाभ सदरहू दोन्ही अधिकाऱ्यांना, उप सचिव पदाचा कार्यभार प्रत्यक्षात घेतल्याच्या तारखेपासून अनुज्ञेय ठरेल, मानीव दिनांक मंजुरीच्या अनुषंगाने थकबाकीची (काल्पनिक वेतननिश्चतीच्या परिणामी) रक्कम सदर दोन्ही अधिकाऱ्यांना देय ठरणार नाही.

७. सदरहू शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७२०/२०१६/का.१२, दि.०६.१२.२०१६ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२७/१७/सेवा-३, दि.०९.०३.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३३११६१२०९०४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2017.03.31 16:14:52 +05'30'

**(इ.मु.काझी)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) प्र.स (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
४) सह/उप सचिव (आस्थापना) - गृह विभाग
५) संबंधित अधिकारी , विभागामार्फत
६) निवड नस्ती कार्या.१४